**आणीबाणीच्या कालावधीत बंदिवास सोसाव्या लागलेल्या व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करणेबाबत मानधन या योजनेअंतर्गत थकबाकी प्रदान करण्यासाठी निधी वितरित करणेबाबत**
**जिल्हा छत्रपती संभाजी नगर व जालना**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१९२३/प्र.क्र.९०/स्वासैक-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ३२.
दिनांक : १२ मार्च, २०२४.

वाचा:
१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.निवृवे१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक१,दि. ०३.०७.२०१८
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.निवृवे१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक१,दि.३१.०७.२०२०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. संकीर्ण-१९१८/प्र.क्र.४०/स्वासैक-१, दि.२८.०७.२०२२
४)जिल्हाधिकारी,छत्रपतीसंभाजीनगर यांचे पत्रक्र.जा.क्र.२०२३/जिबीडेस्क१/स्वा.सै./आणीबाणी/कावि-२७६,दि.२६.०९.२०२३
५)जिल्हाधिकारी,जालना यांचे पत्र क्र.जा.क्र. २०२३/महसूल/स्वा.सै.कक्ष/ कावी-०१, दि.१५/०६/२०२३

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन शासन निर्णयानुसार, महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेल्या, दिनांक २५.६.१९७५ ते दिनांक २१.३.१९७७ या आणिबाणी कालावधीत लोकशाहीसाठी लढा देणा-या मिसा व डी.आय.आर.अंतर्गत सामाजिक व राजनैतिक कारणासाठी कारावास भोगलेल्या व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करण्यासाठी बंदिवास/कारावास कालावधीनुसार त्यांना रु.१०,०००/- अथवा रु. ५,०००/- व त्यांच्या पश्चात पती/ पत्नीस (निम्मे) मासिक मानधन अनुज्ञेय आहे. शासन निर्णय, दिनांक ३१.०७.२०२० अन्वये सदर योजनेची अंमलबजावणी बंद केली होती. शासन निर्णय, दिनांक २८.०७.२०२२ अन्वये, सदर योजना दिनांक १ ऑगस्ट, २०२२ पासून पुन्हा सुरु करण्यात आली आहे.

सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षात “मागणी क्र.ए-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन, (००) (०५) सन १९७५ ते १९७७ मधील आणिबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणा-या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य),५० इतर खर्च (**२२३५ सी २०५**)” या लेखाशीर्षाखाली रु.५४,२०,४०,०००/-इतकी व पावसाळी अधिवेशनात मंजूर पुरवणी मागणीद्वारे रु. २५,८४,००,०००/-मिळून एकूण ८०,०४,४०,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. अद्यापपर्यंत

रु.५९,१५,७२,१०१इतका निधी विविध शासन निर्णयान्वये वितरित केला आहे. सद्यस्थितीत बीम्स प्रणालीवर रु. १,५६,६७,६७९/- इतका निधी शिल्लक आहे.

आणिबाणी मानधन योजनेच्या काही लाभार्थींनी त्यांचा कारावासाचा कालावधी एक महिन्यापेक्षा अधिक असल्याचे पुरावे जिल्हाधिकारी कार्यालयास सादर केल्यामुळे या अनुषंगाने संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयांनी पडताळणी करुन पात्र लाभार्थींना वाढीव मानधन व अनुषंगिक थकबाकी प्रदान करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती संदर्भाधीन दिनांक २६.०९.२०२३ व १५.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केली आहे. या अनुषंगाने निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद आणिबाणी मानधन योजने अंतर्गत पात्र लाभार्थींना मानधन व अनुषंगिक थकबाकी प्रदान करण्यासाठी रु.२,२२,५००/- (अक्षरी रुपये दोन लक्ष बावीस हजार पाचशे फक्त) इतका निधी खालील विवरणात संबंधित जिल्हयांच्या नावासमोर रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे जिल्हाधिकारी **छत्रपती संभाजी नगर, जालना** मंजूर व वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा | लाभार्थी | कालावधी | जिल्हाधिकारी यांना वितरीत करावयाची रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | **छत्रपती संभाजी नगर** | श्रीमती रुख्मिनीबाई दत्तात्रय कुलकर्णी, जिल्हा छत्रपती संभाजी नगर | माहे जाने. २०१८ ते जुलै २०२३ | १,६७,५०० |
| २ | **जालना** | श्री.मारोती गणपत लोखंडे, जिल्हा जालना | जाने. २०१८ ते ऑक्टो. २०२२ | ५५,००० |
| | | | **एकूण** | **२,२२,५००** |

२. उपरोक्त निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना अदा करण्यासाठी सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, स्वातंत्र्य सैनिक कक्ष, मंत्रालय, मुंबई (A००१३) हे नियंत्रक अधिकारी राहतील.

३. संबंधित जिल्हाधिकारी यांनी संबंधित पात्र लाभार्थींना मानधन वितरित करणेबाबतची कार्यवाही करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.संबंधित जिल्हाधिकारी यांनी खर्च झालेल्या रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावे. तसेच खर्च केलेल्या अनुदानाच्या रकमांचा ताळमेळ महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२ नागपूर यांचेकडे विहित कालावधीत करुन खर्चमेळाचा मासिक अहवाल शासनास त्वरित सादर करावा.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.ए-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन, (००) (०५) सन १९७५ ते १९७७ मधील आणिबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणा-या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य),५० इतर खर्च (**२२३५ सी २०५**)" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१२१५४४३९५४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR BALIRAM NANVARE

Digitally signed by KISHOR BALIRAM NANVARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=fe999a6df0afb3cbcb04011b094c0c03933b517a839feb4c64184c7f85f5adb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C5D8A2C16BC0D3779E84FEFC316A16497391C87251547B9A0338E4A70D535BD, cn=KISHOR BALIRAM NANVARE
Date: 2024.03.12 15:53:59 +05'30'

**(किशोर ब. ननवरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

०१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
०२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
०३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
०४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
०५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई.
०६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर.
०७. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर,धाराशिव व जालना
०८. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर,धाराशिव व जालना.
०९. सामान्य प्रशासन विभाग, का.२५, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (अर्थसंकल्प १४ / व्यय-४) मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती/स्वासैक-१.